**पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या कार्यालयीन इमारतींच्या बांधकामासाठी लेखाशिर्ष ४०७००२०२, ५३- मोठी बांधकामे मधून चालू आर्थिक वर्षात अनुदान वितरित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बांधका-०२२५/प्र.क्र. ६८/पोल-७**
दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २४ मार्च, २०२५

वाचा :-

**अपर पोलीस महासंचालक (नि व स), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांकः** पोमसं/२७/सुधरित अंदाजपत्रक/ सन २०२४-२५/४८/२०२४, दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५

प्रस्तावना :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस प्रशिक्षण केंद्र प्रशासकीय इमारत बांधकामासाठी "गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (१२) महाराष्ट्र राज्य पोलीस प्रशिक्षणासाठी कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००२०२), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत रक्कम रुपये १७, ०७, ००, ०००/- (अक्षरी रुपये सतरा कोटी सात लक्ष फक्त) तरतूद करण्यात आली आहे.

पोलीस गृहनिर्माण महामंडळाकडून पोलीस प्रशिक्षणासाठी कार्यालयीन इमारतींचे पोलीस गृहनिर्माण महामंडळाकडून करण्यात येणारे बांधकाम हे पूर्णतः शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीच्या आधारावर करण्यात येते. महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळामार्फत उक्त लेखाशिर्षांतर्गत आवश्यक त्या कामांचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले असून राज्यातील पोलीस प्रशिक्षणाकरिता आवश्यक कार्यालयीन इमारतींच्या बांधकामाकरिता प्राथम्याने निधी वितरित करण्याची विनंती पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन पत्रान्वये केली आहे.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरणाचा प्रस्ताव नियोजन तसेच वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यानुसार नियोजन व वित्त विभागाने प्रस्तुत लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीय निधीच्या ७० टक्के प्रमाणात निधी वितरित करण्यास मान्यता दिली आहे. नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने अर्थसंकल्पीय निधीच्या ७० टक्के म्हणजेच रक्कम रुपये ११.९४ कोटी निधी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस प्रशिक्षण केंद्र प्रशासकीय इमारत बांधकामासाठी “गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (१२) महाराष्ट्र राज्य पोलीस प्रशिक्षणासाठी कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००२०२), ५३- मोठी बांधकामे” या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीत व वितरित निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(रुपये कोटीत)

| लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत निधी | नियोजन व वित्त विभागाने वितरित करण्यास मान्यता दिलेला निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| ४०७००२०२ (५३- **मोठी बांधकामे**) | १७.०७ | ११.९४ |

नियोजन व वित्त विभागाने वितरित करण्यास मान्यता दिल्यानुसार अर्थसंकल्पीत रकमेच्या ७० टक्के उपलब्ध झालेली रक्कम म्हणजेच रक्कम रुपये ११, ९४, ००, ०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी चौऱ्यानव लक्ष फक्त) ही पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत आहे. सदर निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणलीवर (BDS) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयास वितरित करण्यात आली आहे.

वरीलप्रमाणे वितरित करण्यात आलेला निधी “गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (१२) महाराष्ट्र राज्य पोलीस प्रशिक्षणासाठी कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००२०२), ५३- मोठी बांधकामे” या लेखाशिर्षामधून खर्ची घालून चालू आर्थिक वर्ष सन २०२४-२५ मधील अनुदानामधून भागविण्यात यावा.

वरील निधी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करण्यासाठी "पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई" यांना "नियंत्रण अधिकारी" तर त्यांच्या अधिनस्त असलेल्या आहरण व संवितरण अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक ८५/का. १४६१, दिनांक २४/०२/२०२५ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक १५०/२०२५/व्यय-७, दिनांक ०३/०३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१६१२०९१८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN
BALASAHEB
NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.03.24 16:12:46 +05'30'

**(चेतन निकम)**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक तथा महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादीत, वरळी, मुंबई.
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
६. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.)